**ठाणे जिल्हयातील शहापूर तालुक्यात ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी पाणी आरक्षण मंजूरीबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(५२८/१६)/सिंव्य (धो)**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २३.१०.२०१८

**वाचा :** - १) शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/(४४/१५)/सिं.व्य.(धो), दि. १७/११/२०१६
२) शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(५२८/१६)/सिंव्य (धो) दि. २७/०३/२०१७
३) शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(३२१/१७)/सिंव्य (धो) दि. २३/०३/२०१८

**प्रस्तावना :-**

१.० संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी क्षेत्रिय वाटपाच्या मर्यादेनुसार सुधारित स्तर निश्चित करण्यात आलेले आहेत. या शासन निर्णयाच्या परि.२.२ मधील तरतूदीनुसार मा.मंत्री(जसं) यांच्या मान्यतेने ठाणे जिल्हयातील शहापूर तालुक्यातील ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी भावली धरणातून सन २०२१ पर्यत ४.५५ दलघमी पाणी आरक्षणास संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयाच्या परि.२.३ मधील तरतूदीनुसार पिण्याच्या व औद्योगिक पाणी वापराच्या आरक्षण प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार मा. मंत्रिमंडळ उपसमितीस देण्यात आले आहेत. या अनुषंगाने या गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी भावली धरणातून १२.६९ दलघमी पाणी आरक्षणास संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली आहे.

२.० या संदर्भातील त्रुटींचे निवारण करून ठाणे जिल्हयातील शहापूर तालुक्यातील ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी भावली धरणातून देण्यात आलेले १२.६९ दलघमी पाणी आरक्षण लागू करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

३.० ठाणे जिल्हयात शहापूर तालुक्यातील ९७ टँकरग्रस्त गावांना/पाडयांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी भावली धरणातून सन २०२१ पर्यत ४.५५ दलघमी पाणी आरक्षण देण्यासाठी निर्गमित करण्यात आलेला शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(५२८/१६)/सिंव्य (धो) दि. २७/०३/२०१७ निरसित करून त्याऐवजी सदर गावांना प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेसाठी भावली धरणातून १२.६९ दलघमी पाणी आरक्षणास मंजूरी देण्यासाठी निर्गमित करण्यात आलेला शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(५२८/१६)/सिंव्य (धो) दि. २३/०३/२०१८ लागू करण्यात येत आहे.

४.० या संदर्भात शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(५२८/१६)/सिंव्य (धो) दि. २३/०३/२०१८ मधील तरतूदी सर्व अटींसहीत लागू होतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१०२३१६३२००४०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.10.23 16:36:12 +05'30'

**(अ. अ. कपोले)**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.

१०. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद.
१३. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद
१४. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,उत्तर महाराष्ट्र प्रदेश,नाशिक.
१६. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक
१६. मुख्य कार्यजारी अधिकारी, ठाणे जिल्हा परीषद, ठाणे.
१७. निवड नस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)